२००५|१०|S७|११|८००१

**सन २००३-०४ अर्थसंकल्पातील सामाजिक विकास क्षेत्रातील योजना व संकल्पना अंमलात आणण्यासाठी सामाजिक विकास शक्तीप्रदत्त समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एससीडब्ल्यू २००३/प्र.क्र. ७८ /मावक १,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ मे, २००३.

**प्रस्तावना :-** राज्य शासनाच्या वर्ष २००३-२००४ करीता सामाजिक न्यायाच्या संकल्पनेवर आधारित अर्थसंकल्प सादर करण्यात आलेला आहे. या अर्थसंकल्पात ब-याच नवीन संकल्पना अंतर्भूत करण्यात आल्या आहेत, उदा. प्रकल्प एक संघ (प्रोजेक्ट युनाईट), सामाजिक जबाबदारी अधिनियम, सामाजिक न्याय निर्देशांक इत्यादिंच्या अनुषंगाने ब-याच योजनांचा अंतर्भाव अर्थसंकल्पात झालेला आहे. अर्थसंकल्पातील शासनाची भूमिका व धोरण राबविण्याकरीता नवीन योजना विनाविलंब अंमलात आणणे व अर्थसंकल्पातील संकल्पनाशी निगडीत सामाजिक क्षेत्रातील सध्याच्या योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी करुन त्या योजनांचा जनसामान्यांपर्यंत अभिप्रेत लाभ पोहचेल अशा प्रकारे अंमलबजावणी करण्याची गरज आहे. यात योजनांना मान्यता, योजनांचा आढावा संनियंत्रण तसेच समन्वयाची गरज आहे, म्हणून एक प्रभावी यंत्रणा अंमलात आणण्याची गरज आहे. याकरीता प्रशासकीय स्तरावर शक्तीप्रदत्त समिती स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** याबाबत सर्वकष विचार करुन मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सन २००३-०४ च्या अर्थसंकल्पातील सामाजिक विकास क्षेत्रातील योजना व संकल्पना अंमलात आणण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरीय सामाजिक विकास शक्तीप्रदत्त समिती स्थापन करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मुख्य सचिव | : | अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव (नियोजन) | : | सदस्य |
| ३) | प्रधान सचिव, वित्त | : | सदस्य |
| ४) | प्रधान सचिव, (सेवा), सा.प्र.वि. | : | सदस्य |
| ५) | प्रधान सचिव, उच्च शिक्षण | : | सदस्य |
| ६) | सचिव, शालेय शिक्षण | : | सदस्य |
| ७) | प्रधान सचिव, रोजगार व स्वयंरोजगार | : | सदस्य |
| ८) | सचिव, महिला व बाल विकास | : | सदस्य |
| ९) | सचिव, सार्वजनिक आरोग्य | : | सदस्य |
| १०) | सचिव, आदिवासी विकास | : | सदस्य |
| ११) | प्रधान सचिव, सामाजिक न्याय/ सामान्य प्रशासन (सामाजिक विकास) | : | सदस्य सचिव |

२. सदरहू समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :

१) योजनांचा व कार्यक्रमांचा आढावा घेणे व त्याच्या प्रभावी अंमलबजावणी करीता योग्य ती उपाययोजना करणे व संनियंत्रण करणे.

२) त्यासंदर्भातील प्रगतीबाबत शासनास अवगत करणे.

३) विभागीय व जिल्हा स्तरीय सामाजिक विकास शक्तीप्रदत्त समितीच्या कामकाजाचा आढावा घेऊन योग्य ते आदेश देणे.

३. सदरहू समितीस खालीलप्रमाणे अधिकार असतील.

१) योजनांना मान्यता देणे.

२) नवीन पदनिर्मितीस मान्यता देणे.

३) सल्लागार (Consultant) नेमण्यास परवानगी देणे.

४. समितीच्या मान्यतेनंतर संबंधित विभाग त्या विभागाच्या मंत्री महोदयांच्या मान्यतेने पुढील कार्यवाही करेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सुरेश कुमार

( सुरेश कुमार )

प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव.

मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.

मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव.

मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.

अपर मुख्य सचिव, नियोजन यांचे स्वीय सहाय्यक.

प्रधान सचिव, वित्त विभाग.

प्रधान सचिव, (सेवा), सामान्य प्रशासन विभाग.

प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग.

प्रधान सचिव, रोजगार व स्वयंरोजगार विभाग.

सचिव, शालेय शिक्षण विभाग.

सचिव, महिला व बाल विकास विभाग.

सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.

सचिव, आदिवासी विकास विभाग.

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

संचालक, वि.जा.भ.ज. संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

सर्व मंत्रालयीन विभाग

विभागातील सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती मावक १.